**मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांतर्गत कार्यरत असलेल्या श्रीम.वंदना शरद रुपवते, वरिष्ठ लिपिक यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२२/प्र.क्र.३७/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १३ एप्रिल, २०२३.

**संदर्भ :-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२०.
३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दि.२७ सप्टेंबर, २०२२.
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे क्र.मुअ(मुं)/ आस्था-२/८०५/२०२३, दि.१४ फेब्रुवारी, २०२३ रोजीचे पत्र.
५) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांचे क्र.अअ(मुं)/माअअ/ का १७/७२०, दि.३१ जानेवारी, २०२३ रोजीचे पत्र.
६) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१९/प्र.क्र.५८१ ए/१६-ब, दि.१४ डिसेंबर, २०२२.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असलेल्या श्रीम.वंदना शरद रुपवते, वरिष्ठ लिपिक यांचे अनुसुचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्यामुळे त्यांच्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, दि.२७ सप्टेंबर, २०२२ अन्वये अधिसंख्य पद निर्माण करुन त्यांना ११ महिने किंवा त्या सेवेत राहिल्या असत्या तर त्या ज्या दिनांकाला सेवानिवृत्त होतील त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशींवर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. श्रीम.वंदना रुपवते यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदाची मुदत दि.०१ जानेवारी, २०२३ रोजी संपुष्टात आल्यामुळे सदर अधिसंख्य पदास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असलेल्या श्रीम.वंदना शरद रुपवते, वरिष्ठ लिपिक यांचे अनुसुचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्यामुळे सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, दि.२७ सप्टेंबर, २०२२ अन्वये त्यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४ डिसेंबर, २०२२ मधील अनु क्र.२ नुसार ०१ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन ११ महिने (दि.०३ जानेवारी, २०२३ पासून ते दि.०२ डिसेंबर, २०२३ पर्यंत) किंवा त्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ. क्र. | कर्मचाऱ्याचे नांव | पदनाम | नियुक्तीचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीम.वंदना शरद रुपवते | वरिष्ठ लिपिक | ०१/०१/१९९१ | ३१/०५/२०२९ |

**२.** श्रीम.वंदना रुपवते यांच्या अधिसंख्य पदावरील वेतनावर होणारा खर्च हा श्रीम.रुपवते ज्या कार्यालयात कार्यरत राहतील, त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधीत वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**३.** सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२१ डिसेंबर, २०१९, दि.३० जून, २०२० व दि.१४ डिसेंबर, २०२२ या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०४१३१७५५२७३३१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO

Digitally signed by SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=1fbca76d11ad25e383a0e28da215f01e12183c1b565ddd29aaf1ffbfad8e9e9c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6F385E4139AB144CAAF92B440B55068479C3789EA50EC85EB7A16B7C932CB397, cn=SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO
Date: 2023.04.13 18:00:11 +05'30'

**( विक्रमसिंह प्र. शिंदे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-** १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई.

२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.

३) अपर मुख्य सचिव (सा.बां.) /सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.

४) महालेखापाल (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

५) प्रधान महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.

६) कार्यासन सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) निवडनस्ती.